GR-20040728161711001-1100.

अश्वशक्तीवर आधारित दराने वीज बिले भरलेल्या कृषी ग्राहक व यंत्रमागधारक यांना सवलत देणे व त्याअनुषंगाने महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळास अनुदान देणे.

**महाराष्ट्र शासन**
उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,
शासन निर्णय क्र.टॅरिफ-२००४/प्र.क्र.२४/ऊर्जा-३
दिनांक: २७.२.२००४.

**प्रस्तावना-**

महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळाने दिनांक १.९.९८ पासून राज्यातील सर्व वर्गातील वीज ग्राहकांना सुधारित वीज दर लागू केले होते. उच्चदाब कृषीग्राहकांच्या बाबतीत लागू केलेले वीज दर जास्त असल्यामुळे सदर वीज दर कमी करण्याबाबत संबंधित ग्राहकानीं वेळोवेळी शासनाकडे विनंती त्याचप्रमाणे निवेदने सादर केली होती. सदर बाब त्याचप्रमाणे कृषीग्राहक व यंत्रमागधारक यांच्याबाबतीत दि. १.५.२००० पासून लागू करण्यात आलेल्या मीटरवरील सवलतीच्या दराऐवजी शासनाने लागू केलेल्या अश्वशक्तीवर आधारित सवलतीच्या दराने आकारणी करण्याची बाबही शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

विचाराधीन असलेल्या बाबींवर सखोल विचार करुन शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतलेले आहेत.

१) ज्या कृषि ग्राहकांनी दिनांक १.९.१९९८ ते ३०.४.२००० या कालावधीसाठी रुपये १०००/- प्रति अश्वशक्ती या दराऐवजी रु. ६००/-प्रति अश्वशक्ती प्रति वर्ष या रक्कमेचा भरणा नियमितपणे केलेला आहे त्या ग्राहकांच्याबाबतीत फरकाची रक्कम रुपये ४००/- प्रति अश्वशक्ती प्रति वर्ष व त्या रक्कमेवरील व्याज व विलंब आकार शासन भरेल.

२) सदर आकारणीमुळे येणारी फरकाची रक्कम, त्याचप्रमाणे सदर रक्कमेवरील व्याज व विलंब आकार माफ केल्यामुळे महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळास होणा-या महसूली नुकसानीची भरपाई करण्याच्या दृष्टीने तेवढया रकमेचे अनुदान म.रा.वि.मंडळास देण्यात यावे.

३) ज्या कृषीग्राहक व यंत्रमागधारकांना मीटर बसविण्यात आले परंतु त्यांनी मीटरप्रमाणे बिल न भरता त्या त्या वेळी प्रचलित असलेल्या अश्वशक्तीच्या दराने नियमितपणे वीज बिलाचा भरणा केलेला आहे, त्यांच्याबाबतीत दि. ३०.११.२००३ पर्यंतच्या कालावधीसाठी अश्वशक्तीप्रमाणेच आकारणी करण्यात यावी. या दोन्ही दरांतील फरकाची रक्कम तसेच त्या रक्कमेवरील व्याज व विलंब आकाराची रक्कम शासन भरेल.

४) वरीलप्रमाणे आकारणी केल्यामुळे दोन्ही दरातील फरकाची रक्कम, त्याचप्रमाणे त्या रक्कमेवरील व्याज व विलंब आकार माफ केल्यामुळे म.रा.वि.मंडळास होणा-या

महसूली नुकसानीची भरपाई करण्यासाठी तेवढया रकमेचे अनुदान म.रा.वि.मंडळास देण्यात यावे.

५) वरील १) व ३) मधील सवलती विचारात घेतल्यानंतर ज्या कृषिग्राहकांकडे दि.१.१०.२००३ रोजी कोणतीही थकबाकी शिल्लक राहत नाही अशा कृषिग्राहकांना " कृषी संजीवनी " योजनेअंतर्गत १.१०.२००३ ते ३०.९.२००४ या कालावधीसाठी ५० टक्के सवलत देण्यात येईल.

६) ज्या कृषीग्राहक व यंत्रमागधारकाना मीटर बसविण्यात आलेले आहे त्यांनी दि.१.१२.२००३ पासून शासनाच्या सवलतीच्या दराने मीटरप्रमाणे वीज बिलाचा भरणा करणे आवश्यक राहिल.

७) सदर शासन निर्णय मुळा-प्रवरा इले.को.ऑप.सोसायटीच्या कार्यक्षेत्रातील कृषीग्राहक व यंत्रमागधारक यांच्या बाबतीतही लागू राहिल.

८) उपरोक्त परिच्छेद क्र. २ व ४ येथील कार्यवाही महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहिल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

शि.ना.मानेकर

(शि.ना.मानेकर)

शासनाचे अवर सचिव

प्रति,

अध्यक्ष,महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ,प्रकाशगड,बांद्रे (पूर्व),मुंबई-४०००५१.

मुळा-प्रवरा इलेक्ट्रीक को.ऑ.सोसायटी लि., श्रीरामपूर, जि. अहमदनगर.

सचिव,महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर,सेंटर नं.१ १३ वा मजला, कफ परेड,कुलाबा,मुंबई-४००००५.